**महावितरण कंपनीच्या इन्फ्रा ॥(भाग-२) योजने अंतर्गत पायाभूत सुविध विकास या योजनेसाठी महावितरण कंपनीस  शासनाकडून २०% भाग भांडवल मिळणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र.निधिवि-२०१४/प्र.क्र.४३ ऊर्जा-३,**

मंत्रालय, मुंबई — ४०००३२,

दिनांक : ३१ मार्च, २०१५

**संदर्भ :**- १. शासन निर्णय उद्योग ऊर्जा व कामगार विभाग क्र. इन्फ्रा-॥/२०१२/प्र.क्र.८७२/ऊर्जा-५ दिनांक ०२ मार्च २०१३

२. शासन निर्णय उद्योग ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२०८/ऊर्जा-५ दिनांक १९ डिसेंबर २०१३

**प्रस्तावना :-**

पायाभूत सुविधा विकासासाठी इन्फ्रा ॥(भाग-२) राज्य शासनाकडून २० टक्के रक्कम भाग भांडवलाच्या रुपाने महाराष्ट्र वीज वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) कंपनीस उपलब्ध करुन देण्यास शासनाने संदर्भाधीन आदेशान्वये मान्यता दिलेली आहे. त्यानुसार वित्तीय वर्ष सन २०१४-१५ मध्ये रु.३४०,००,००,०००/- इतकी  मूळ अर्थसंकल्पिय तरतूद व रु.२५५,००,००,०००/- सुधारित अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली आहे. त्यापैकी रु. १५८,४९,०८,०००/- इतकी रक्कम (महावितरण) यांना देण्यात आलेली आहे व उर्वरित रु.९६,५०,९२,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

पायाभूत सुविधा विकासासाठी इन्फ्रा ॥(भाग-२) राज्य शासनाची भांडवली गुंतवणूक म्हणून महावितरण कंपनीने केलेल्या खर्चाच्या २० टक्के या प्रमाणात रु.९६,५०,९२,०००/- (रुपये श्याहण्णव कोटी पन्नास लाख ब्याण्णव हजार फक्त )  इतकी रक्कम महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास या निर्णयाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२.	वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-११, ४८०१ वीज प्रकल्पावरील इतर भांडवली खर्च,०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, पंचवार्षिक योजना, राज्य योजना, (००) (०२) स्वतंत्र गावठाण फिडर योजना व पायाभूत सुविधा विकास (४८०१३६०६) ५४ गुंतवणूक" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे मांडवे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु.९६,५०,९२,०००/- (रुपये श्याहण्णव कोटी पन्नास लाख ब्याण्णव हजार फक्त )अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नांवे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेली रक्कम वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या कॅश फ्लोच्या (मासिक वितरण) मर्यादेत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१५३/१४६१ दिनांक ३०/०३/२०१५ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ १९४/२०१५, व्यय-१६, दि.३१/०३/२०१५ अन्वये मिळालेल्या त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०३३११२२४५२२४२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.03.31 22:55:45 +05'30'

(वि.म.राजुरकर)

शासनाचे अवर सचिव

**प्रत -:**

१) व्यवस्थापकीय संचालक,महावितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.

२) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा मुंबई-०५

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई-४०००२०.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -२, नागपूर.

६) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप / रालेवि-१), मुंबई.

७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.

८) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई४०० ०५१.

९) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) विशेष कार्य. अधिकारी (उर्जा-५), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई-३२

११) क.अ.(प्रशासन-१), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई-३२

१२) वित्त विभाग, /(अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती /साऊ / व्य-१६) मंत्रालय, मुंबई, ३२.

१३) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४००००१.

१४) व्यवस्थापकीय संचालक, महासूत्रधार कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग,फोर्ट, मुंबई.

१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.